**गडचिरोली येथे प्रत्येकी २०० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय आदिवासी मुलांचे व मुलीचे वसतीगृह बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवबां-२०१०/प्र.क्र.२०२/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१०.**

**वाचा- आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. शाआवबां/२०१०/प्र.क्र.२४/का८(२), दि.३.९.२०१०.**

**प्रस्तावना:-** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी उपरोक्त पत्रान्वये गडचिरोली येथे प्रत्येकी २०० विद्यार्थी क्षमतेच्या आदिवासी मुलांच्या व मुलींच्या शासकीय वसतिगृहाचे अंदाजपत्रक सादर केले असून या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** : गडचिरोली येथे प्रत्येकी २०० विद्यार्था क्षमतेच्या आदिवासी मुलांच्या व मुलींच्या शासकीय वसतीगृहाचे बांधकाम करण्यासाठी रु.३,४४,११,०००/- ( अक्षरी रुपये तीन कोटी चव्वेचाळीस लाख अकरा हजार फक्त ) इतक्या रकमेस मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर कामास सक्षम प्राधिका-यांकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.
२) सदर कामाचे नकाशे/ आराखडे मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन सांक्षाकित करण्यात यावेत.
३) इमारत बांधकाम सुरु करण्यापुर्वी बांधकामासाठी आवश्यक असलेली जमिन विभागाच्या ताब्यात असल्याची खात्री करण्यात यावी.
४) सदर बांधकामाचा खर्च सन २०१०-११ साठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५१७ अन्वये सहमती घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०२९१९१५१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( कैलास द. भंडलकर )**
**उप सचिव**

**प्रति,**
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गडचिरोली जि. गडचिरोली.
जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली, जि. गडचिरोली.
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, वडसा जि.गडचिरोली
सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)